**राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पामध्ये भूजल माहिती व तंत्रज्ञान केंद्राच्या प्रगतीपथावरील बांधकाम व आस्तित्वातील इमारतीच्या अग्निशमण यंत्रणा उभारणी व पहारेकरी कक्षाच्या बांधकामास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भूजल१८२१/प्रक्र ८२(भाग-१)/पापु-१५**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ११ जानेवारी,२०२२

वाचा- १) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५, दि.१० नोव्हेंबर, २०२०.
२) शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५ सप्टेंबर, २०१९.
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.भूजल १८२१/प्र.क्र.८२/पापु-१५, दि.६ जुलै, २०२१.
४) जल शक्ती मंत्रालय, जलसंपदा, नदी विकास, गंगा पुर्नजीवन विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र.एक्स ६००२९/१/२०१७/एन एच पी/२९२४, दि.१ डिसेंबर, २०२१.
५) आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र.भूसवियं/राजविप्र/बांधकाम/प्रशासकीय मान्यता/२०२१/५७७, दि.१६ डिसेंबर, २०२१.

**प्रस्तावना -**

जागतिक बँक अर्थसहाय्यीत राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत भूजल माहिती व तंत्रज्ञान केंद्राच्या प्रस्तावीत बांधकाम/इमारत, अस्तित्वातील इमारत याकरिता अग्निशमन यंत्रणा उभारणी व पहारेकरी कक्षाच्या बांधकामाच्या (अंदाजित खर्च १,४५,४४,०२६/- सेंटेज चार्जेस वगळता) प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

२. जागतिक बँक अर्थसहाय्यीत राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत भूजल माहिती व तंत्रज्ञान केंद्राच्या प्रस्तावीत बांधकाम/इमारत, अस्तित्वातील इमारत याकरिता अग्निशमन यंत्रणा उभारणी व पहारेकरी कक्षाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास व कामांना पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक २५.०९.२०१९ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार रु.१५ कोटीपेक्षा कमी रकमेच्या अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या अधिकाऱ्याने अंदाजपत्रकास तांत्रिक सहमती प्रदान केल्यानंतर संबंधित मुख्य अभियंता यांनी सदर अंदाजपत्रकाप्रमाणे काम करण्याची शिफारस भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेकडे केल्याच्या अधिनतेने सदर मान्यता देण्यात येत आहे.

II. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

III. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

IV. नियोजित जागा विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. **<u>इमारत बांधकाम व नुतनिकरण:-</u>**

| अ.क्र. | प्रस्तावित भूजल माहिती व तंत्रज्ञान केंद्राच्या प्रस्तावीत बांधकाम/इमारत, अस्तित्वातील इमारत याकरिता अग्निशमन यंत्रणा उभारणी व पहारेकरी कक्षाच्या बांधकामाची अंदाजपत्रकीय किंमत रूपये (सेंटेज चार्जेस वगळता) |
|---|---|
| ०१. | १,४५,४४,०२६/- |

४. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या इमारत बांधकामांसाठी निधी प्राप्त झाल्यानंतर इमारत बांधकामाची कामे तातडीने सुरु करण्यात येऊन विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावीत.

५. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घेण्यात यावी.

६. बांधाकामासाठी विलंब अथवा इतर कारणाने वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर इमारतीचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. सदर इमारत बांधकाम कामांना आवश्यकतेनुसार निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करुन देण्यात यावा.

७. सदर इमारत बांधकामांवरील खर्च राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

८. सदर इमारत बांधकाम प्रगतीपथावर असताना संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरुपात सादर करावा.

९. इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकातील इमारत बांधकामाव्यतिरिक्त इतर सोयी सुविधांच्या समावेशाबाबत शासन स्तरावरुन दिलेल्या विविध सुचना विचारात घेवून संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा यांच्या स्तरावर खातरजमा करुन प्रसाधन गृहे इ. सोयींचा आवश्यकतेनुसार अंतर्भाव करावा.

१०. इमारतीचे बांधकाम पुर्ण झाल्यानंतर इमारतीचा ताबा घेण्यापूर्वी सदर इमारतीस आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे ऊत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पुर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करुन घ्यावी व त्याचा स्थळ निरिक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करुन ठेवावा.

११. सदरील इमारत बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा यांनी घ्यावी.

१२. उपरोक्त खर्च राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत उपलब्ध तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

१३. **सदर इमारत बांधकाम व अनुषांगिक कामे राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पांतर्गत उपलब्ध निधीतून घेण्यात असल्याने व त्यासंबधीच्या कृती आराखड्यात नमुद मर्यादेत घेण्यात येत असल्याने, त्याचप्रमाणे अंदाजपत्रकात भाववाढीची पुरेशी तरतूद केल्याचे विचारात घेवून सदर बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देय राहणार नाही याची अंमलबजावणी यंत्रणांनी कटाक्षाने नोंद घ्यावी**.

१४. **केंद्र शासनाने दि**.१ डिसेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये सुधारित केलेल्या प्रकल्प आराखड्यास प्रशासकीय मान्यतेच्या अधिनतेने सदर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१५. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१, उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास वित्तीय अधिकारा प्रदान करण्यात आले

आहेत. सदर प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

**१६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१११११५२२१८९७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.01.11 18:52:18 +05'30'

**( गणेश पवार )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव. मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.
११. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१२. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१३. वित्त विभाग (व्यय-३/अर्थसंकल्प १८) मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-१), मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (पापु-१५)